ॐ श्रीगणेशाय नमः । अन्य शक्ति आदिशक्तीस प्रार्थिती । विकट माहात्म्य ऐकलें भावभक्तीं । त्यायोगें विशेष हर्ष चित्तीं । योगामृत मय वाटला आम्हां ।।१।। तथापि देवि न तृप्त । आमुचें संपूर्णतया चित्त । रसवर्धक कथा ऐकण्या अविरत । उत्सुक आमुचें अंतःकरण ।।२।। पुनरपि विघ्नेश्वराची कथा । सांगून करी दूर व्यथा । विकट जे अन्य अवतार घेत । त्यांची कथा सांग आम्हांसी ।।३।। आदिशक्ति तैं निरूपित । विकटाचें चरित्र अद्भुत । चक्रपाणि राजा राज्य करित । गंडकी नगरींत धर्मशील ।।४।। त्याची पत्नी उग्रा पतिव्रता । होती अत्यंत गुणान्विता । नीतिपरायण तो नृप होता । देव विप्र अतिथि पूजी ।।५।। पंचयज्ञ नित्य करित । भूमंडळ सर्व जिंकित । देवमान्य संपत्ति भोगित । बाहुबळानें तो नृप ।।६।। परी एक दुःख त्यास जाळित । जें जें अपत्य त्यास होत । तें तें उपजतांच मरत । होतें वंध्यत्व दंपतीसी ।।७।। त्यास्तव विधियुक्त दान देत । व्रतें वैकल्यें आचरित । तथापि एकही संतति न जगत । परमेश्वराची कृपा नसे ।।८।। म्हणोनि राज्य अमात्याहातीं । सोपवून वनास जाण्याप्रती । स्त्रीसहित दुःखित चित्तीं । उद्युक्त तो जाहला ।।९।। त्या वेळीं तेथ अकस्मात । शौनक मुनिसत्तम येत । यदृच्छेनें तो योगी श्रेष्ठ । प्रवेश करी नृपसदनीं ।।१०।। त्या शौनक मुनीनें नृपाप्रत । उपदेशिलें सूर्याचें व्रत । नराधिप तें भक्तीनें करित । त्यायोगें तुष्टला रविदेव ।।११।। राणीस स्वप्नदृष्टान्त होत । गर्भवती ती होई त्वरित । सूर्यतेजयुक्त गर्भ उदरांत । धारण करण्या असमर्थ

ती ।।१२।। दाहयुत अत्यंत पीडित । समुद्रांत गर्भ त्यागित । तेथ सागरीं बाळ जन्मत । त्रिनेत्र चक्रधारक ।।१३।। तो समुद्राचें पाणी शोषित । ब्राह्मणरूपें तैं चक्रपाणि नृपाप्रत । समुद्र जाऊन सांगे वृत्त । त्या नृपाच्या पुत्राचें ।।१४।। त्या नृपसुतास नृपाच्या स्वाधीन । करून समुद्र अन्तर्धान। जाहला तैं नृप प्रसन्न । पुत्रलाभें त्या वेळीं ।।१५।। सर्व प्रजाजनांसमवेत। पुत्रजन्मोत्सव करित । त्या बाळाचें जातकर्मादि करवित । द्विजहस्तें हर्षभरें ।।१६।। त्या पुत्राचें नांव ठेवित । द्वीजानुमतीनें सिंधु प्रख्यात । अपार वीर्यवंत तो सुत । बलशाली बहु निपजला ।।१७।। आज्ञा घेऊन वनांत जात । तपाचरणास उत्कंठित । शुक्राचार्य त्यास मंत्र देत । विधियुक्त सूर्यदेवाचा ।।१८।। तदनंतर सिंधु आचरित । उत्तम तप एकपादस्थित । निराहार तो व्रती राहत । सूर्यास त्यानें तोषविलें ।।१९।। दोन सहस्र वर्षें जात । तैं काश्यप सविता प्रकटत । वर मागण्यास सांगत । त्रैलोक्यवैभव त्यास देई ।।२०।। अमृतपानक त्यास देत । त्रिगुणभावें जो हीन असत । ब्रह्मशास्त्रग देहयुक्त । तोचि एक तुज वधिल ।।२१।। अन्यथा अमृत काढून । कोणी मारू न शकेल बलवान । त्रैलोक्यांत अजिंक्य होऊन । राज्य अबाधित करशील ।।२२।। ऐसें सांगून स्वभक्ताप्रत । सविता अन्तर्धान पावत । सिंधु स्वगृहा परत जात । मातापिता आनंदले ।।२३।। त्याचें स्वागत करिती । तेज:पुंज त्याची कांति । त्यास राज्य देऊन जाती । राजाराणी वनांत ।।२४।। तदनंतर सिंधु जिंकित । सप्तद्वीपवती धरा समस्त । वरदान त्यास जैं अद्भुत प्राप्त । तें कळतां असुर एकवटले ।।२५।। शुंभ अतिशुंभ वृत्र कमळ । शंख कोलासुर सबळ । इत्यादि असुरवीर महाबळ । त्याच्या आज्ञांकित जाहले ।।२६।। त्यांच्या सहित तो जिंकित । शंभु मुख्यादि देवांस स्वर्गांत । शंकर वनीं पळून जात । सोडून कैलास आपला ।।२७।।

विष्णु सूर्य विधि इंद्रादींस पकडून । बंधनांत त्या टाकून । देवेंद्रां त्या जिंकून । वर्चस्व आपुलें स्थापिलें ।।२८।। ऐशापरी त्रैलोक्य जिंकित। महा असुर तो शक्तियुक्त । दैत्येंद्रासी स्थापित । देवस्थानांत सर्व जागीं ।।२९।। ऐसा बहुकाळ जात । महा असुर तो क्रोधयुक्त । त्वेषानें देवतीर्थादिक भंगवित । कर्मकांड नष्ट करी ।।३०।। आपुल्या प्रतिमा करून । भूमंडळीं सर्वत्र स्थापून । देशोदेशीं प्रतिनगरीं पूजन । प्रजेकडून करवी त्यांचें ।।३१।। तेव्हां सर्व हाहा:कार करिती । वर्णाश्रमी जन जगतीं । स्वाहा स्वधादी कर्म निश्चिती । नष्ट जाहलें सर्वत्र ।।३२।। आतां शक्तींनो त्या असुराचा । वध कैसा साचा । जाहला नंतर तयाचा । वृत्तान्त पुढे मीं सांगेन ।।३३।। शंकर आपुल्या गणांसहित । त्रिसंध्या क्षेत्रीं जात । गौतमादींच्या सहित । स्त्रियांसह वास करी तेथें ।।३४।। ध्यान लावून विघ्नेशा भजत । शंकर तैं भक्तियुक्त । एकदा पार्वती त्यास विचारित । संशयाकुल मानसीं ।।३५।। देवींनो ती विनययुक्त । म्हणे ईश तूं जगतांत । सर्व देवांचा म्हणून ईश्वर ख्यात । वेदशास्त्रें हें सांगतीं ।।३६।। महेश्वर तूं देव थोर । कोणाचें ध्यान करिशी नम्र । सांग रहस्य संशयहर । पदकमलाची मी दासी तुझ्या ।।३७।। शिव तेव्हां तिज सांगत । ईश अनीशांस जो निर्मित । त्या गणेशासि मीं भजत । ब्रह्मपतीस भक्तीनें ।।३८।। गकार अनीश स्मृत । णकार ईशमय ख्यात । त्यांचा स्वामी गणेश ज्ञात । चारुहासिनी हें वेद सांगती ।।३९।। त्याचें तें वचन ऐकत । तेव्हां पुनरपि त्यास विनवित । त्या गणेशाची प्राप्ति मजप्रत । कैसी होईल तें सांगा ।।४०।। ऐशा गणेशाचें ज्ञान । नसे मजला मी अज्ञान । त्याच्या प्राप्त्यर्थ साधन । उपाय कोणता मुख्य असे ।।४१।। शिव तैं सांगे पार्वतीप्रत । एकाक्षर मंत्र घे विधियुक्त । त्याच्या जपानें अविरत । तप करी तूं पार्वती ।।४२।। ध्यान करून

तोषवी । देव गजाननाचा कृपौघ वळवी । जेणें सिद्धि तूं आघवी । प्राप्त करशील मत्प्रिये ।।४३।। ऐसें बोलून तिज देत । गणेश मंत्र तो पुनीत। त्याचा स्वीकार करित । प्रणाम करून पार्वती ।।४४।। तदनंतर ती देवी जात । लेखनाद्रीवरी त्वरित । त्या मनोहर स्थानीं आचरित । तप घोर पर्वतसुता ।।४५।। वायुही भक्षण न करित । तपमग्न ती ध्यान करित । ऐशा रीती आराधित । ढुंढी गजानन ती तोषवी ।।४६।। शंभर वर्षे ऐसीं जात । तैं वरद गणेश प्रकटत । म्हणे वर माग मीं संतुष्ट। पार्वती तैं प्रार्थितसे ।।४७।। म्हणे विघ्नपा माझा सुत । होई देवा तूं भविष्यांत । त्या वेळीं तुझी सेवा अविरत । विशेषभावें करीन मी ।।४८।। तूं आमचा होतां सुत । आम्हीं बंधहीन होऊ त्वरित । मातापिता गणेशाचे ख्यात । ऐसें द्यावें वरदान ।।४९।। पार्वतीस देत वरदान । भाविकाचा मनोरथ मान्य करून । विघ्नेश्वर पावला अन्तर्धान । पार्वती स्थापना करी त्याची ।।५०।। विप्रहस्तें स्थापना करित । गणेशासी भक्तिभावें पूजित । तदनंतर जाऊन शंकराप्रत । वृत्तान्त त्यास सांगितला ।।५१।। तो शिवही अति हर्षित । जाहला ऐकून तो वृत्तान्त । पार्वती तन्मय होत । वरद प्रभूसी स्मरतसे ।।५२।। भाग्यगौरवें सर्वत्र पाहत । गणराजास ती सतत । भाद्रपदमासीं मूर्ति करित । शंकरासह पूजिली तैं ।।५३।। शुक्ल पक्ष चतुर्थी सोमवार । माध्यान्ही स्वाती नक्षत्र । त्यावेळीं ती मूर्ति मनोहर । सजीव झाली वरप्रभावें ।।५४।। वरप्रद विकट चेतनायुक्त । स्वतेजानें दिपवीत । शिवपार्वती पाहूं न शकत । स्तुति करिती मनोभावें ।।५५।। देवा तुला उग्रतेजयुक्त । पाहण्या आम्हीं असमर्थ। तरी आतां कृपावंत । होऊन घ्यावें सौम्यरूप ।।५६।। तिची प्रार्थना ऐकून । सौम्य तेज जाहला गजानन । शिव पाही त्यास प्रसन्न । षड्भुज चंद्रासम कांति ।।५७।। ब्राह्मणांकरवी करवित । जातकर्मादि

विधियुक्त । अकराव्या दिवशीं बारसें करित । गुणेश तैं नांव ठेविलें ।।५८।। शिवपार्वती ब्राह्मण पूजन । करिती हर्षयुक्त मन । गुणेश जन्मला हें वृत्त ऐकून । आनंदलें त्रैलोक्य ।।५९।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते गुणेशावतारवर्णनं नाम सप्तत्रिंशत्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय सदतिसांवा संपूर्ण)